**श्रीम. मधुमती सरदेसाई - राठोड, उप जिल्हाधिकारी, भूसंपादन (सामान्य), धुळे यांची पर्यटन संचालनालयाचे प्रादेशिक कार्यालय, नाशिक विभाग येथे प्रतिनियुक्तीने नियुक्ती करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : टिडीसी- २०१९/०७/प्र.क्र. ४७१/पर्यटन**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : ०२ डिसेंबर, २०२१.

**संदर्भ :-**
१. पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र. क्र. टीडीसी-२०१४ /२ /प्र.क्र.९६ / पर्यटन, दि.१२.०४.२०१६.
२. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०११/प्र.क्र.१३७/१२, दि.१७.१२.२०१६
३. संचालक, पर्यटन संचालनालय यांचे पत्र क्र.प.सं./आस्थापना/अतिरिक्त कार्यभार / नाशिक / २०२१/१५९४, दि.०८.०१.२०२१
४. महसूल व वन विभाग, शासन निर्णय, क्र.टिआरएफ-०८२१/प्र.क्र.९८/ई-२, दि.२८.१०.२०२१

**आदेश :-**

श्रीम. मधुमती सरदेसाई - राठोड, उप जिल्हाधिकारी, भूसंपादन (सामान्य), धुळे यांची उप संचालक, पर्यटन संचालनालय, नाशिक विभाग या पदावर प्रतिनियुक्तीने खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून नियुक्ती करण्यात येत आहे :-

अ) उप संचालक (पर्यटन) प्रादेशिक कार्यालय, नाशिक हे वेतनश्रेणी (एस-२३, रु.६७७०० ते रु.२०८७००) मधील पद असून श्रीम. मधुमती सरदेसाई § राठोड सदर पदावर कार्यरत असेपर्यंत अथवा पुढील आदेशापर्यंत सदर पद श्रेणी अवनत करण्याच्या अधीन राहून नियुक्ती करण्यात येत आहे.

ब) श्रीम. मधुमती सरदेसाई - राठोड, उप जिल्हाधिकारी, भूसंपादन (सामान्य), धुळे, उप संचालक, पर्यटन संचालनालय, नाशिक विभाग या प्रतिनियुक्तीच्या पदावर रुजू झाल्याच्या तारखेपासून त्यांच्या प्रतिनियुक्तीच्या सेवेचा प्रारंभ होईल आणि ज्या तारखेला त्या आपल्या मूळ पदाचा कार्यभार पुन्हा स्विकारतील त्या तारखेस त्यांची प्रतिनियुक्ती संपुष्टात येईल.

क) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनाला आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्यांना परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन / सक्षम प्राधिकाऱ्यास म्हणजे महसूल व वन विभागास राहील.

ड) जर त्यांची सेवा स्वीयेतर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही तर त्यांना मूळ विभागाकडे परत पाठविण्याची मुभा शासनास म्हणजेच पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागास राहील. मात्र, याप्रमाणे परत पाठविण्यापूर्वी या विभागाने महसूल व वन विभागास तीन महिन्यांची नोटीस दिली पाहिजे;

इ) श्रीम. मधुमती सरदेसाई- राठोड यांनी मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे अशी कमीत कमी तीन महिन्यांची नोटीस पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागास दिल्यानंतर त्यांना मूळ विभागाकडे परत पाठविण्यात येईल.

ई) श्रीम. मधुमती सरदेसाई- राठोड यांना महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा... ई) नियम १९८१ मधील नियम ३९ व ४० (परिशिष्ट दोन) मधील तरतुदी व त्या नियमाखालील परिशिष्ट तीन मधील तरतुदी लागू राहतील. तसेच सामान्य प्रशासन विभाग, शा.नि.क्र.एसआरव्ही-२०११/ प्र.क्र.१३७/१२, दिनांक १७/१२/२०१६ यामधील तरतुदी देखील लागू राहतील.

फ) श्रीम.मधुमती सरदेसाई- राठोड सेवाविषयक बाबी या त्यांच्या मूळ विभागामार्फत हाताळल्या जातील.

२. श्रीम. मधुमती सरदेसाई, राठोड, उप जिल्हाधिकारी, भूसंपादन (सामान्य), धुळे यांच्या इतर सर्व प्रशासकीय बाबी महसूल व वन विभागामार्फत हाताळण्यात येतील. श्रीम. मधुमती सरदेसाई- राठोड यांना प्रतिनियुक्तीच्या पदावर हजर होण्यासाठी महसूल विभागाने त्यांचे आदेश क्र. टिआरएफ-०८२१/ प्र.क्र.९८/ ई-२ दि.२८.१०.२०२१ अन्वये यापूर्वीच कार्यमुक्त केले आहे.

३. श्रीमती मधुमती सरदेसाई, राठोड यांनी दि.०१.११.२०२१ रोजी प्रधान सचिव (पर्यटन) यांना रुजू अहवाल सादर केला असून त्यांचा दि.०१.११.२०२१ पासून त्या कार्यभार स्वीकारतील त्या दिनांकापर्यंतचा कालावधी प्रतिक्षाधिन कालावधी म्हणून समजण्यात यावा.

४. श्री. नितीन मुंडावरे, उपजिल्हाधिकारी (रो.ह.यो.) नाशिक, यांना संदर्भ क्र.३ येथील दि.०८.०१.२०२१ रोजीच्या पत्रान्वये उपसंचालक (पर्यटन) प्रादेशिक कार्यालय, नाशिक या पदाचा देण्यात आलेला अतिरिक्त कार्यभार या आदेशाच्या दिनांकापासून संपुष्टात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२११२०२१७२०३९९८२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ramesh Jayaram Kadam

Digitally signed by Ramesh Jayaram Kadam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=931a917c29ea693ba9abee543d58bf1b6ade60ae69c9be92f59d232bb3a3fcc8, serialNumber=c8fbeb4e149e205d858dabb5d81a2a90a8deb719257572300ef79cfab47d9345, cn=Ramesh Jayaram Kadam
Date: 2021.12.03 17:30:21 +05'30'

**(र. ज. कदम)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव (महसूल व वन विभाग), यांचे स्वीय सहाय्यक,मंत्रालय, मुंबई.

२. प्रधान सचिव (पर्यटन), यांचे स्वीय सहाय्यक,मंत्रालय, मुंबई.

३. संचालक, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

४. जिल्हाधिकारी, नाशिक

५. श्रीम. मधुमती सरदेसाई, राठोड, उप जिल्हाधिकारी, भूसंपादन (सामान्य), धुळे,

६. श्री. नितीन मुंडावरे, उपजिल्हाधिकारी (रो.ह.यो.) नाशिक,

७. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.

८. निवड नस्ती (पर्यटन).